आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता उर्वरीत ४० % निधी वितरण. ( लेखाशिर्ष - २२१० G २८९ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/प्र.क्र.०५/का-०६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ३१.०१.२०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वि. वि, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि. १.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वि. वि, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि. ८.०७.२०१९.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक,दि.१९.०९.२०१९.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, नस्ती क्र. मफुयो- २०१९/प्र.क्र.२०५/ आरोग्य-६.

**शासन निर्णय:-**

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना--राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०६) महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना ( २२१० G२८९ ) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात रु.१५००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर अर्थसंकल्पित निधीपैकी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकान्वये विहित ६० % निधी वितरण मर्यादेत रू.९००.०० लाख निधी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागास वितरीत करण्यात आला आहे.

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या वाचा क्र. ४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता लेखाशिर्ष (२२१० G२८९),३१-सहायक अनुदाने ( वेतनेत्तर ), या लेखाशिर्षाखाली उक्त अर्थसंकल्पित निधीपैकी १०० % च्या मर्यादेत उर्वरीत रु. ६००.०० लाख ( अक्षरी रुपये सहा कोटी फक्त ) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. संबंधित नियंत्रक अधिकारी/ प्रशासकिय विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने वाचा येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०२/व्यय-१४,दि.३.०१.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२८१५४११७४८२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.02.03 15:41:32 +05'30'

किरण कि.पवार
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३) वित्तीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी (महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना), वरळी, मुंबई.
४) अपर आयुक्त (सर्व), आदिवासी विकास,
५) प्रकल्प अधिकारी (सर्व), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई
११) कार्यासन अधिकारी (का. ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.